विशेष केंद्रीय सहाय्य (Special Central Assistance) योजनेसाठी SNA-SPARSH अंतर्गत केंद्राकडून Mother Sanction म्हणून मंजूर केलेला रु. १५००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग,

**शासन निर्णय क्र.- एनएएक्स-०५१९/प्र.क्र.१००(भाग-१)/विशा-१ब**

दुसरा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - १० मार्च, २०२५.

वाचा-

१. केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाचे पत्र क्र. १(२७)/PFMS/२०२०, दि. २१/०५/२०२४.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र. ५१/कोषा प्रशा-४, दि. ११/१०/२०२४.

**प्रस्तावना-**

डावी कडवी विचारसरणीने तीव्र स्वरुपात प्रभावित झालेल्या गडचिरोली जिल्ह्याकरिता पायाभूत व अन्य सुविधा यासाठी विशेष केंद्रीय सहाय्य (Special Central Assistance) ही १००% केंद्र पुरस्कृत योजना असून सदर योजनेचा निधी SNA खात्यात कोषागारामार्फत देयक सादर करुन आहरीत करण्यात येत होता. आता केंद्र शासनाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये विशेष केंद्रीय सहाय्य (Special Central Assistance) या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता SNA-SPARSH या प्रणालीद्वारे निधी वितरीत करण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार विशेष केंद्रीय सहाय्य (Special Central Assistance) या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी SNA-SPARSH प्रणाली कार्यान्वित करणे आवश्यक आहे.

२. केंद्र शासनाने सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये विशेष केंद्रीय सहाय्य (Special Central Assistance) या योजनेसाठी Mother Sanction म्हणुन रु.१५००.०० लक्ष इतका निधी वितरीत केला असल्याचे कळविले आहे. त्यानुसार, सदर निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत होणे अत्यावश्यक आहे. ही बाब लक्षात घेऊन, सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पिय अंदाजपत्रकातील तरतूदीनुसार विशेष केंद्रीय सहाय्य (Special Central Assistance) या योजनेकरीता Mother Sanction म्हणुन मंजूर केलेला रु. १५००.०० लक्ष इतका निधी जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

डावी कडवी विचारसरणीने तीव्र स्वरुपात प्रभावित झालेल्या गडचिरोली जिल्ह्याकरिता पायाभूत व अन्य सुविधा यासाठी विशेष केंद्रीय सहाय्य (Special Central Assistance) या १००% केंद्र पुरस्कृत योजनेकरिता केंद्र शासनाने Mother Sanction म्हणुन मंजूर केलेला रु. १५००.०० लक्ष इतका निधी जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली यांना खालील तक्त्यामध्ये नमूद लेखाशीर्षनिहाय सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजुर तरतुदीतून खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| लेखाशीर्ष | उद्दिष्ट | अर्थसंकल्पीत तरतूद रु. | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| मागणी क्र. बी-१०, ४०५५ पोलीसांवरील भांडवली खर्च (००) २०७ राज्य पोलीस (००)(१२) नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्ह्यासाठी पायाभूत सेवा व सुविधा (४०५५ ०२७९) | ३१- सहायक अनुदाने (बिनशर्त) (वेतनेतर) | ३०,००,००,०००/- | १५,००,००,०००/- |

२. सदर रक्कम आहरित करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, गडचिरोली तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी, गडचिरोली यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तिय अधिकारांचे प्रत्यायोजन व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१०१६५१५९००२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT ANANT MAHAJAN

Digitally signed by HEMANT ANANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=18b72890e049ba3219e993bae40e4fae87fba16fd8c92cbf7f96107d9c100ae1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4146B85AAA58555E80C9D75A2ABA23B993E46DF208B0B469F1B74670DC22D7FA, cn=HEMANT ANANT MAHAJAN
Date: 2025.03.10 16:52:48 +05'30'

**(हेमंत महाजन)**
**उप सचिव, गृह विभाग.**

**प्रत:-**

१. जिल्हाधिकारी, गडचिरोली.

२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
४. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षल विरोधी अभियान), नागपूर.
६. पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, नागपूर.
७. पोलीस अधीक्षक, गडचिरोली.
८. अधिदान व लेखाधिकारी, गडचिरोली.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, गडचिरोली.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
११. वित्त विभाग (कार्यासन व्यय-७/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव/कक्ष अधिकारी (रोख शाखा/अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. संग्रहार्थ नस्ती / निवडनस्ती (वि.शा.१ब).